# स्थळ -- दिवाणखाना

**-- चं.प्र.देशपांडे.**

या एकांकिकेत एकच पात्र आहे. नीलकंठ. वय ३५ ते ४०.
स्थळः अर्थातच दिवाणखाना. वेळ -- संध्याकाळनंतर.
पडदा उघडतो तेव्हा नीलकंठ समोर बसलेला. काहीसा थकलेला. पण विचारचक्रात.

नीलकंठः ( काही क्षणांनी --) एखाद्या गडद, घट्ट सीमेजवळ आल्यासारखं वाटतं. इथून पुढं काहीच नाही. आता विचार. म्हणजे या सीमेच्या कडेकडेनं फिरत राहणं. मग इथपर्यंत तरी येण्याला काय अर्थ आहे ? का येतो मी इथपर्यंत --? कधी येतो ? काहीतरी असह्य झाल्यावर ? पळून जाण्यासाठी ? ह्यँ ! महिन्याला दोनचार अपमान या पगारात परवडतात. नोकरी सोडली तर रोज याच्याहून भयानक, अगणित अपमान होतील. त्यापेक्षा हे परवडलं ! ( उभा राहून -- ) स्पीड ! स्पीड हवा -- म्हणाले. नुसताच स्पीड नाही -- स्पीड ॲन्ड ॲक्युरसी -- म्हणजे वेग आणि बिनचूकपणा -- असं मराठीत म्हणून -- कळलं काय ? -- असं म्हणाले. पाहिजेच -- म्हणाले. पाहिजेच म्हणजे पाहिजेच -- म्हणाले. खरंच आहे. स्पीड पाहिजेच ! नाहीतर मरशील ! मरशील म्हणजे मरण पावशील ! वेळ नाहीय ! वेळच नाहीय ! कुणालाच ! वेळच नाहीय ! काय असेल ते थोडक्यात बोल ! चटकन निर्णय सांग ! झटकन काम पूर्ण कर ! याचा अर्थ असा नाही की तुझ्या अंतःस्फूर्तीला वाव दिलाय ! नो ! सगळं पायरीपायरीनंच हवंय, पण वेगात ! तू कुणाच्या मृत्यूची तारीख सांगू शकत नाहीस. किंवा येणाऱ्या संकटांची यादी आगाऊ देऊ शकत नाहीस -- म्हणूनच तुझ्या अंतःस्फूर्तीला वाव नाही. तुझ्या विचारांची पध्दत वैयक्तिकच असणार आहे -- ती जास्तीत जास्त बिनचूक आणि यशस्वी होणारी हवी ...( वळून -- ) अशी कोण नटी आहे दाखवा की जी कपडे उतरवत नाही ! -- नटीच विचारते ! म्हणते, गेला तो जमाना -- कोपरापर्यंत बाह्या आणि लहान गळा ! आता तुम्हाला तुमचं कर्तृत्व वेगात प्रस्थापित करायचं आहे ! तुम्ही किती काळ टिकाल हे सांगता येत नाही ! कारण बदलही वेगात घडतील ! न जाणो -- मधेच -- पुन्हा क्षणभर -- जुना जमानाही येऊन जाईल । सांगता येत नाही ! (चेवानं -- ) काम का झालं नाही याची रडगाणी सांगत येऊ नकोस ! वुई वॉन्ट रिझल्टस् ! तू यशस्वी झालास की अयशस्वी एवढंच सांग ! तुझा आळशीपणा सहन केला जाणार नाही ! तुझी अकार्यक्षमता सहन केली जाणार नाही ! याही परिस्थितीत यशस्वी होणारे दुसरे आहेत ! तू बाजूला हो ! पुन्हा माझ्यासमोर येऊ नकोस ! तुझ्यासारख्या रडक्या माणसाचे प्रॉब्लेम्स ऐकत बसायला मला वेळ नाही ! नो टाईम ! सॉरी ! ( बसत --) कुणालाच वेळ नाही ! उरलेल्या फावल्या वेळात करमणूक हवी साली ! करमणूक पाहिजेच ! झटपट ! लांबड नको ! कामाच्या वेळातही गंभीर राहा आणि एरवीही गंभीर राहा -- हे जमणार नाही ! उगीच आपलं थोडं रिलॅक्सेशन हवंय ! बास ! अगदीच काही नऊला झोपायचं नाहीय ! मग पिक्चर म्हणा किंवा गाणी चालतील ! हजार लफडी आहेत ! एकही माणूस मोकळा नाही ! गाणं ऐकून झाल्यावर विसरलं गेलं तरी चालेल ! तेवढ्यापुरतं धरणारं हवं ! काय चूक आहे? एखाद्याला आर्टफिल्म काढायचीय म्हणून आम्हाला बोअर करायचं नाही ! इथं कुणाला वेळ आहे ? बसा, वाचा, विचार करा, एखाद्या कलाकृतीच्या प्रक्रियेबरोबर सहृदयतेनं जा -- कोण करणार हा उद्योग ! नवीन संशोधन नकोय । -- म्हणजे दुःख का होतं वगैरे असल्या निरुपयोगी प्रश्नांचं ! दुःख होतं आणि होणार -- हे मान्य आहे ! पुढं चला ! काळाबरोबर राह्यचं तर यातच सुरक्षितता आहे ! सुरक्षित किंवा असुरक्षित काय असेल ते झटकन जगा ! तुमच्या वैयक्तिक सुखदुःखाला इथं महत्त्व नाही ! पण ते सुखदुःख असलं पाहिजे एवढी अट आहे ! ( काही क्षणांनी -- ) समाजासाठी तुम्ही काय केलंत ? समाज ! एक भिकारचोट थाप ! पण एक अटळ सत्य ! एकेकट्या माणसांची कधीच होऊ न शकणारी बेरीज ! त्या बेरजेचेही उपविभाग ! वेगवेगळ्या उपविभागांचे वेळेनुरूप डांगोरे पिटा ! ज्याच्यात्याच्या शक्तीवर सगळं चालणार ! इथं वैश्विक बोलायची गरज असते -- पण आपला उपविभाग पुढे न्या ! वेगात ! वेग महत्त्वाचा ! वैयक्तिक लेव्हलवर वैश्विक बोललात तरी चालेल ! तुम्ही कुठल्या लेव्हलवर काय करताय हे बघायला कुणाला वेळ नाही ! सगळं मिळून काय पुढे

रेटलं जातंय हे महत्त्वाचं ! पुढे रेटा ! अजून रेटा ! ( दोन क्षणांनी -- ) थोडक्या वेळात बसवायचं ! लई अवघड हाय ! नोकरी कधी करायची, धंदा कधी करायचा ! आणि शिवाय आपले आपले प्रॉब्लेम्स बघावे लागतातच ! ते कधी बघायचे ? टी.व्ही.कधी बघायचा ? वर्तमानपत्रं, मासिकं, पुस्तकं, रस्त्यावरच्या जाहिराती ! काय काय बघायचं ! डंकेल प्रस्ताव माहिती नाही ? गॅट माहिती नाही ? बरं, खुली अर्थव्यवस्था तरी ? प्रश्न ! नो ! हा विषय नको ! माणसांच्या वीकनेसेसबद्दल बोला -- प्रश्नांबद्दलही बोला -- खरा प्रश्न हा नसून तो आहे -- असंही म्हणा-- पण प्रश्न असतात हे मान्य करा ! त्यांचं काय व्हायला पाहिजे ते सांगा -- काय झालं ते सांगा -- आता कोणती सावधगिरी बाळगली पाहिजे तेही सांगा ! ते चालेल ! माझं समजा बावीस हजार एकशे सदतीस एकूण प्रश्नांचं आयुष्य आहे ! मी आत्ता पंधरा हजार पाचशे त्र्याण्णवव्या प्रश्नावर आहे ! आणि सध्या मला सात महत्त्वाचे प्रश्न आहेत ! त्यांचं महत्त्व कसं जोखायचं ? समजा प्रश्न नंबर तीन हा सगळ्यांत महत्त्वाचा आहे -- मग मी माझ्या उपलब्ध वेळातला जास्त वेळ त्याला द्यायला नको ? तरी करेक्ट किती द्यावा ? पण तसं होतच नाही. प्रश्न नंबर दोन किंवा सातच चुकून जास्त वेळ खाऊन जातो ! निकडीमुळं असेल किंवा मला बरोबर भान राहात नाही म्हणून असेल ! पण ही गफलत नेहमी होते आणि कुठल्या प्रश्नाची लायकी किती वेळ खर्च करायची आहे -- हे मला कधीच कळत नाही ! कळतही नाही आणि वळतही नाही ! काय फरक पडतोय ! जिवंत आहे तोवर जिवंत आहे ! मेलो की मेलो ! खरं तर या भडव्याचे कुठलेच प्रश्न महत्त्वाचे नव्हते ! नाहक वेळ खर्च करत बसला -- असंही होईल ! -- या सगळ्याचं स्थळ दिवाणखानाच का ? तर त्या त्या फॉर्मची सोय ! लोक येणंजाणं, पुन्हा काही काळानंतर येणं--जाणं -- हे सगळं पटण्यासारखं -- त्यातल्या त्यात -- व्हायचं असेल तर हेच ठिकाण आहे. बरं, आपल्याला प्रतीकात्मक चालत नाही. कल्पनाशक्तीवर आधारित नेपथ्य नकोय. बघणाऱ्याच्या डोक्याला ताप देऊन वेगवेगळी दृश्यं दाखवायचा डाव चालणार नाही. गरज नाही त्याची. आणि मुळात जास्त बदल नकोच आहेत. तापच नकोय. म्हणून स्थळ दिवाणखाना -- ठीक आहे. दुसरं स्थळ आमचं डोकं ! चालू द्या ! दिवाणखान्यात सतत गर्दी नसते. अनावश्यक माणसं येत -- जात नाहीत. त्यामुळं काही काळ एखादं पात्र इथं एकटंही असू शकतं. डोक्याचं तसं नसतं म्हणा ! पण तो विषय नको ! स्थळ दिवाणखाना ठीक आहे ! भाषा वापरणारच ना तुम्ही -- माहीत असलेलं -- सवयीन येणारं -- सगळंच वापरणार. या मर्यादा मान्य आहेत. पुढं बोला. (फोनची रिंग वाजते.) म्हणजे आधी फोन घ्या आणि मग पुढं बोला. ( जातो. फोन उचलतो.) हॅलो, हो, बोलतोय -- अरे, मी बाहेरच निघालो होतो -- बाहेर पडणार एवढ्यात रिंग झाली -- एक क्षण उशीर झाला असता तर नुसती रिंग होत राहिली असती -- तर ! अर्जंटच आहे ! नाही, आज पीत बसण्याचा मूड नाही. म्हणजे बरं नाही ते -- बरं, आता सांगूनच टाकतो -- आमच्या नात्यातल्या एका मुलीला एका लिंगपिसाटानं भोसकलंय -- ती हॉस्पिटलमध्ये आहे -- नाही, नाही -- पूर्वीची काही ओळख नाही -- रस्त्यात ! -- अचानक तिच्या समोर आला आणि म्हणाला की चल माझ्याबरोबर ! तिनं आरडाओरडा केला तर भोसकलं ! बसस्टॉपवर ! पंचवीसतीस लोक होते म्हणे तिथं ! कुणीही मधे पडलं नाही ! -- तो पुढं गेला -- पुढं काय झालं ते कळायचंय अजून ! उद्याची बातमीच समज ही ! -- भिकारचोट साले ! -- पण तिचं दुर्दैव -- हेच खरं ! -- नेमकी तीच का असावी तिथं -- त्यावेळी ! -- ओके ! ( फोन ठेवतो.) पण ते सगळं कशाला ? स्थळ दिवाणखानाच ! सध्या तरी ! मी स्वतःसुध्दा स्थळ दिवाणखानाच ! मूड नाही म्हणजे काय ? बरं नाही म्हणजे काय ?-- म्हणजे बरं दिसणार नाही आणि बरं वाटणार नाही ! कुणाला ? मलाही ! का ? का नाही ? समाज ! असंख्य उपविभाग असलेला भिकारचोट समाज ! राह्यचंय की नाही समाजात ? आणि हे सगळं ध्यानात घेऊन चालणारा मी ! म्हणजे मीच ! प्रामाणिक सामाजिक !--मलाही दुःख होतं -- माझी एखादी अस्वस्थता सलत राहते -- माझी एखादी सूचना एखाद्या सयुक्तिक कारणानं दुसऱ्यानं नाकारली तरी मला त्रास होतो -- पण हे कधी बघायचं सगळं ? -- स्पीड हवाय ! च्यायला वेळ नाही, वेळ नाही म्हणजे काय, उजवा पाय दुखतोय की छातीत डाव्या बाजूला दुखतंय हेही कळू नये ! आह्...थोडं दुखतंय, थोडं दुखतंय म्हणता म्हणता जास्तच झालंय सालं ! (बसतो. उजवा पाय दाबत राहतो. ) एखादी नटीसुध्दा झटकन चमकण्यासाठी कपडे उतरते -- ठीक आहे, चुकलं म्हणते -- पण व्हॉट डझ इट मॅटर म्हणते -- कुठं दुखतंय हे कळण्यासाठी झटकन असं काय करता येईल ? -- मी दुःखी झालो -- मी आत्महत्या केली -- काय फरक पडतो ? माझं मी असं झटकन काहीही केलं तरी काय फरक पडतो ? मी मेलो तर

काय एक दिवसाची सुट्टी जाहीर होणार आहे की दरवर्षी माझी पुण्यतिथी पाळली जाणार आहे ? -- एकानं मरायचं आणि बाकीच्यांनी त्याची पुण्यतिथी पाळायची हेच मुळात हिडीस आहे -- कशाला महत्त्व देऊन चालतं हे सगळं ? --यश ! --सक्सेस ! -- अचीव्हमेंटस् ! -- समाजासाठी काम करून गेलेला माणूस असतो तो !-- स्त्रियांना न्याय देणारा, गरीबांची कणव असणारा, दुःखितांचे अश्रू पुसणारा -- लिंगपिसाट माणसात आणि याच्यात काय फरक असतो ? -- दोघंही आपापल्या मनानं वागत असतात -- आणि मनानं काय हालचाल करावी याच्यावर दोघांचाही ताबा नसतो--पण एक समाजाविघातक असतो आणि एक सुधारक -- सेवक ! -- वागण्याचे परिणाम -- फायदेतोटे महत्त्वाचे ! त्यातून निर्माण होणारं सुखदुःख ! -- ( नक्कल करत ) मला त्यानं चांगलं शिकवलं -- मला त्यानं वाईट मार्गाला लावलं -- त्यानं वाईट उदाहरण घालून दिलं -- वगैरे -- बास ! नुसती शरीरं तर असतात सगळी ! मनयुक्त शरीरं ! जशीच्या तशी -- म्हणजे जशी होती तशी जन्मलेली ! मग उरलेले जसे आहेत तसे पुण्यतिथी साजरी करणार ! काय हरकत आहे ! लिंगिपसाटानं सुधारकाची पुण्यतिथी साजरी करायची ! म्हणजे मी आहे तसा ! तसाच ! मग पुण्यतिथी कशाला ! आम्ही त्यांच्यासारखे होण्यासाठी ? ते तर होऊ शकत नाही ! म्हणजे त्यांच्यामुळं समाजाला झालेल्या सुखाचे आभार !? -- पुण्यतिथी ! -- भिकारचोटगिरी ! -- मुख्य प्रश्न त्यांच्यासारखं होण्याचा नाही -- मुख्य प्रश्न मी अस्वस्थ का -- दुःखी का -- हा आहे -- आह् -- मला तर च्यायला छाती का पाय ते कळत नाहीय अजून-- आह् -- जाऊं दे। नो टाईम ! फास्ट जा ! एकवेळ भरकटत जा ! मर ! पण डोंट वेस्ट टाईम ! टाईम इज मनी ! आई म्हणतेच, नीलकंठा, पूजा झाली का ?  जे ते वेळच्या वेळी घडलं पाहिजे. माझ्या हातून आता जे घडायला पाहिजे तेच घडणार आहे ! आत्ता ! इथं ! स्थळ -- हाच सोयीस्कर दिवाणखाना ! तो इथं येणार आहे -- ज्याच्याशी तिचं लग्न ठरलं आहे -- मीच बोलावलं आहे -- कशासाठी ते त्याला माहीत नाही -- तोच ! माझा मित्र ! म्हटलं तर हा त्रिकोण आहे, म्हटलं तर नाही --पण माझ्या दृष्टीनं आहेच ! आहेच !--येईल, पण इथून तो परत जाणार नाही -- ठार मरेल तो --   इथं ! -- स्थळ दिवाणखाना -- फास्ट !-- क्षणात घडेल सगळं ! -- पण असं आधी ठरवून ठेवणं मला शोभून दिसत नाही -- हा तर प्लॅन्ड, कोल्डब्लडेड मर्डर झाला ! -- म्हणजे होणार ! -- खरं तर जगण्याच्या ओघात, रागाच्या भरात, आपोआप फास्ट झालं पाहिजे सगळं -- पण काय फरक पडतो ? -- या फास्ट जगातच -- वेगानं -- शांतपणे ठरवलंय मी सगळं !--ती त्याची होता कामा नये -- तोच विषय ! -- तेच सगळं ! -- हो, पण वेगळं काय शक्य आहे ? -- मला संताप न येणं -- किंवा मी वस्तुस्थिती मान्य करणं -- नाईलाज किंवा दुःख न होता -- शक्य आहे ? -- विचार नकोय -- म्हणजे विचार हवाय -- विचार सगळा हवाय, पण झटकन -- लगेच उत्तर हवंय -- आणि एखादी गोष्ट ठरवण्यात वेळ कितीही -- कमीजास्त -- गेला तरी पध्दत तर एकच असते ना ! -- मी जे काय वागतो किंवा करतो -- त्यात माझी जबाबदारी किती -- माझं कर्तृत्व किती -- हे कुठल्या शास्त्रज्ञाला सांगता येतंय !-- शास्त्रीय दृष्टिकोणाची कास धरावी असं म्हणणाऱ्या आणि पुण्यतिथ्या साजऱ्या करणाऱ्या समाजाला हे माहीत आहे का ? -- की शास्त्रज्ञ इथे हात टेकतात ते ? -- या प्रश्नाचा शोध घेणारे शास्त्रज्ञ कुठे आहेत ? पुण्यतिथ्या साजऱ्या होतात त्या शास्त्रीय दृष्टिकोणातून की अध्यात्मिक की सामाजिक दृष्टिकोणातून ?-- समजा सामाजिक तर अध्यात्मिक का नाही ? जास्त उपकारक -- जास्त चांगला दृष्टिकोण कुठला ? अध्यात्मिक किंवा शास्त्रीय दृष्टिकोण जर जास्त चांगला असेल तर सामाजिक दृष्टिकोणातून पुण्यतिथ्या कशाला ? लिंगपिसाटानं साजरी केलेली सुधारकाची पुण्यतिथी ! लिंगपिसाटपणानं भोसकणारा आणि मालकी हक्काच्या भावनेला धक्का पोचल्यामुळं भोसकणारा यात जास्त वाईट कोण ? की जास्त चांगला कोण असं विचारलं पाहिजे ? कायदेशीर किंवा आर्थिक दृष्टिकोण घेतले तर काय होईल ? ( संतापाच्या अविर्भावात -- ) उभा राहा माझ्यापुढे ! इथे ! आणि आता मी तुला तुझ्या कृत्याचा जाब विचारतोय ! जास्त विचार करायचा नाही ! मला लगेच उत्तर हवंय ! विचार कितीही कर, पण उत्तर चटकन हवंय ! तुझी एकट्याची परीक्षा घेत बसायला इथं कुणाला वेळ नाही ! तू आहेस तसा -- आहेस त्यातून उत्तर दे -- चुकीचं किंवा बरोबर हा प्रश्न नाही -- तू काय, कसा आहेस हे व्यक्त होईल असं उत्तर आलं की पुरे ! कारण जे काय असेल त्यापेक्षा वेगळं काही असू शकणार नाही ! तेच बोल ! मग सामाजिकदृष्ट्या काय ते ठरवलं जाईल ! तुला मी जाब विचारतोय पण उद्या जर मी वाईट ठरलो तर तुझी पुण्यतिथी साजरी होईल ! पण आज तू माझ्या हातात आहेस ! जरी मी पुढच्या सगळ्या दृष्टिकोणांच्या हातात

असलो तरी ! ( काही क्षणांनी ) खरं तर आमच्या ओळखीचं प्रेमात रूपांतर व्हायला लागलं होतं. त्याच सुमारास खरं तर माझ्यामुळंच त्याची आणि तिची ओळख झाली. कारण तो माझा मित्र होता आणि ती मैत्रिण. पण नंतर हळूहळू तिच्या माझ्याशी वागण्यात प्रेमाऐवजी व्यावहारिक आपुलकी यायला लागली आणि त्याच्याबरोबरच्या वागण्यात प्रेम ! असं का झालं ? हळूहळू तिची निवड बदलली असेल का ? कशामुळं ? तो अधिक चांगला दिसतो, अधिक प्रभावी वाटतो किंवा त्याचं चालणं अधिक रुबाबशीर आहे म्हणून की तो कुठल्याही विषयावर शांतपणे सविस्तर विश्लेषणात्मक बोलू शकतो म्हणून ? पण तिला हे कसं कळलं नाही की कुठल्याही विषयात त्याला इनसाईट नाही -- नुसता वरवरचा पसरटपणा आहे -- स्वतःला सुचलेला ओरिजिनल विचार नाही-- त्याची निर्णयशक्ती कमकुवत आहे -- हे सगळं तिला दिसलं नसेल ? की ती देखाव्याला फसली असेल ? की खरं तर त्यानंच तिला आणि मला फसवलं ? मला तरी असंच वाटतं ! पण हे तिला सांगून काही उपयोग नाही. तिची ती निवड करणार -- तिचा ती निर्णय घेणार ! बरोबर असेल नाहीतर चूक असेल ! त्याची फळं तिची ती भोगेल ! दुसऱ्याचं ती कसं ऐकेल ? या क्षणी तर सगळं बरोबरच वाटणार तिला. पण ही आमची दोघांची वेगवेगळ्या प्रकारे फसवणूकच होतेय ! आणि तो असं दाखवतो की मला तिच्याबद्दल आकर्षण होतं हे त्याच्या कधीच लक्षातही आलं नाही. समज जरा कमीच आहे त्याला. कदाचित खरंच त्याच्या हे डोक्यातच शिरलं नसेल. पण मला हा ढोंगीपणा वाटतो. याच्यावर उपाय एकच. या डेंजरस माणसाला धडा शिकवणे ! मला तेच करायचंय ! थोड्याच वेळात तो इथं येईल. आयुष्यातला शेवटचा धडा शिकणं आज त्याच्या नशीबातच आहे. ते होईलच ! होईलच ते ! ( काही क्षणांनी --) पण सध्या वय काय चाललंय माझं ? म्हणजे हा क्षण बऱ्याच पूर्वीच येणार होता ! तो आलाच नाही ? म्हणजे पहिला तिच्याबद्दलचा क्षणही चुकला आणि दुसरा त्याला धडा शिकवण्याचाही चुकला ! चुकलेल्या क्षणांचं अहिंसक आयुष्य आहे माझं ! हेच माझं नशीब ? हे !? मला ज्या ज्या वेळी जे जे वाटलं ते ते मी केलंच नाही ! मग मला ते तसं वाटण्याचा उपयोग काय होता ? आपण जे करू शकतो तेवढंच खरं तर माणसाला वाटलं पाहिजे ! सगळी अस्तित्वात न आलेल्या क्षणांची स्मृतिचित्रं का सांभाळत बसलोय मी ? आणि आत्ताच्या क्षणांचं तरी मी काय करतोय ? ( हरवल्यासारखा रिकामा होतो .. दोन क्षणांनी -- ) वेळच नाहीय ! चटकन काय जी जशी असेल तशी करमणूक द्या ! बास ! पैसे घ्या त्याचे ! पैसे हवेतच ! आयुष्यातले तुमचे किती तास झोपडपट्टीत गेले, किती फाईव्हस्टार हॉटेलात गेले ? किती कॉन्फरन्सेस तुम्ही अटेंड केल्यात ? किती विचारविनिमयांत सहभागी झालात ? मार्केट ट्रेंड कळले तुम्हाला ? खप वाढला ? जाहिरातींचे कितपत परिणाम झाले ? तुम्ही निवडलेली माणसं कशी निघाली ? रिझल्टस् देणारी की नुसतीच टाय लावून फिरणारी ? आणि देशाच्या राजकारणावर तुम्ही कितपत प्रभाव टाकू शकलात ? हे सगळ्यात महत्त्वाचं ! स्वतः राजकारण करणं किंवा राजकारणावर प्रभाव टाकायची क्षमता असणं या दोनच खरं तर सर्वात आदरणीय गोष्टी आहेत. तुमची प्रसिध्दी किती आहे तो प्रश्न नाही. पण ओळखणारे तुम्हाला ओळखून राहिले पाहिजेत. याच्यात तिच्यायला नेहमीच प्रॉब्लेम होतो. साधं आपल्या अवतीभवतीची माणसं जरी घेतली तरी अवघड आहे. जातींचे गट आहेत. धर्मांचे गट आहेत, थोड्याफार प्रमाणात पक्षगटही आहेत. वेगवेगळ्या युनियन्स आहेत. मॅनेजमेंटमध्येसुध्दा गट आहेत. नातेवाईक, मित्र यांच्यामध्येही गट आहेत. हे सगळं सांभाळणं आणि सहीसलामत राहणं फार अवघड आहे. अकरा ते सात काम केलं म्हणजे झालं ? -- मॅनेजमेंट म्हणणार. अकरा ते सात काम करणं एवढंच तुमचं कर्तव्य आहे का ? -- युनियनच्या बाबतीत तुमची काही बांधिलकी नाही ? उद्या तुमच्यावर संकट आलं एखादं तर मग मात्र याल युनियनकडे धावत ! -- युनियन म्हणणार. नातेवाईक, मित्र म्हणणार -- काय भेटला नाहीत बरेच दिवसात ! तुमचा रॅपो कमी पडतो -- एखादा अधिकारी सूचना देणार. हे एवढ्यावरच संपत नाही सालं ! माझं एकट्याचं -- स्वतःचं काय आहे ? माझ्या स्वतःच्या आवडीनिवडींच्याही चिरफळ्या उडालेल्या आहेत. एका वेळी दोनदोन, तीनतीन गोष्टी कराव्या असं मला वाटतं ! किंवा कधीकधी काहीच करू नये असं वाटतं ! त्यात परमकर्तव्यदक्ष पत्नी स्वाती म्हणते की मृण्मयीला बरेच दिवसात कुठं नेलं नाही आपण -- एखाद्या छोट्याशा ट्रिपला जाऊन येऊ ! किंवा मग दोघीही -- खरेदीला चला म्हणतात. किंवा अमुकतमुक यांच्या मुलाच्या वाढदिवसाला चला म्हणतात. तिथं तर गेलंच पाहिजे म्हणतात. या सगळ्याचं भान राहणं आणि सांभाळता येणं, अवघड नाही -- अशक्य आहे सालं ! आणि माझा स्वभाव हा असा ! जरा म्हणजे बराचसा असा एकलकोंडा छाप ! नुसते याचेच मला

किती परिणाम भोगावे लागतात याचासुध्दा हिशोब केला पाहिजे. म्हणूनच कितीही बोंब मारली तरी माणसं दैववादी होतच राहणार साली ! स्वभाव हेच दैव ! दैववादाचा तसा उपयोग काहीच नाही ! पण कळत नाही तो भाग त्याच्यात बंद करून टाकता येतो ! -- हा उपयोग आहेच ! आणि तो तर फार मोठा -- ( फोनची रिंग वाजते. थांबतो. पाहतो. रिंग वाजतच राहते.तसाच उभा राहतो.) हा फोन कुणाचा, कशासाठी असणार आहे ते मला माहीत आहे. वडिलांनी घेतलेला फोन आयताच वारसाहक्कानं मिळालाय ! फॅक्टरीतल्या नव्या युनियनचं लफडं ! हा धुरळा एकदा स्थिरावेपर्यंत हे असंच चालणार ! नव्या पुढाऱ्यांची बैठक झाली असणार आहे ठरल्याप्रमाणे. आता ते निरनिराळ्या माणसांना, त्यांच्यातल्या योग्य त्या माणसांतर्फे कॉंटॅक्ट करायला सुरुवात करणार. माझ्याशी थोडंफार जवळकीनं बोलू शकेल त्यानं माझ्याशी बोलायचं ! गरजेप्रमाणे या पध्दती बदलायच्या ! आता हा भडवा जो फोन करणारा आहे तो तिकडं का गेलाय हे मला माहीत आहे -- पण लेव्हल सगळी विचारस्वातंत्र्याचीच ठेवावी लागेल. अर्थात् मी माझं विचारस्वातंत्र्य वापरूनच त्यांच्यात सामील व्हावं असंच ते म्हणणार ! मी नाही म्हणालो तर त्याचा त्यांना राग येणार नाही असं मात्र नाही. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे नसलेल्या विचारस्वातंत्र्याचा त्यांना राग येणारच ! तर त्यांना कितपत राग येईल आणि त्याचे परिणाम काय होऊ शकतील किंवा त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वागलं तर त्याचे काय परिणाम होऊ शकतील -- याचाच विचार करायचं स्वातंत्र्य मला जास्त वापरावं लागणार आहे. कुठल्याही बाजूला नाही म्हटलं की भोसकलं जाणार हे धरून चलायचं ! -- म्हणजे अगदी सुऱ्यानं नव्हे ! दुसरी अहिंसक हत्यारं काय कमी आहेत ! हे म्हणणार आपल्याला मॅनेजमेंटचाच आशीर्वाद आहे -- काळजीच नाही आणि सध्याचे म्हणणार -- मॅनेजमेंटनं उभी केलेली खोटी युनियन आहे ती -- ती अन्यायाचा प्रतिकार करूच शकणार नाही ! रिंग थांबली वाटतं ! ( पाहतो. पुन्हा रिंग सुरू होते.) मी घरी आहे हे माहीत आहे त्यांना. फोन उचलला नाही तर ते घरी येणार. पण आता जर घेतला तर डोकं डिस्टर्ब होणार, रात्रीची झोप खराब होणार ! पण नाही तरी ते होणारच आहे. कारण ते घरी येणार हे नक्की ! ( फोनजवळ जातो. फोन घेतो.) हॅलो ! हं ! कोराळकर ! हं, बोल,बोल ! काही नाही, घरीच आहे. नाही, आहे एकटाच घरी पण काय झालं, संध्याकाळपासून जरा डोकं दुखत होतं, तापही आलाय जरा. आमच्या नात्यातली एक मुलगी हॉस्पिटलमध्ये आहे -- तिकडंही जाऊन यायचं होतं -- अरे हो, माझ्या लक्षात होतं, पण हे सगळं असं झालं -- घरी येऊन पडलो मग जरा. जेवण ? तसं येताना थोडंसं खाऊन आलो मी. आणि वासनाही नाही तशी. नाही, नाही, नको, नको ! तू कशाला या वेळी ! आणि मी खरं बोलतोय ! प्लीज ! हं, झोपलोच होतो ! असं काय ! मग मी झोपेत असेन ! आधीची रिंग काही ऐकू आली नाही. हो, रेस्टच घेतो आता. अरे, लक्षात नाही असं कसं होईल ! फॉर्म ?। अरे, तुझ्याइतके धडाडीचे नसलेलेही आमच्यासारखे काही लोक असणारच ! ते लगेच बदलणार नाहीत ! नाही, नाही, घाबरतो असं नाही, पण -- तसं नाही -- नुसतं पटण्या न पटण्याचा प्रश्न नाही -- नाही, लोकशाही आहे, विचारस्वातंत्र्य आहे -- ते सगळं मान्य आहे. तुमचं चुकतंय असं मी काही म्हटलंय का ? मी काय म्हणतो, तू इतकी गळ घालतोयस की जणू काही मी एक परका, कुणीतरी नवीनच ओळख झालेला माणूस आहे ! बरं बाबा, तू प्रेमाच्या हक्कानं बोलतोयस ! माझंही त्यात हित आहे म्हणूनच तू सांगतोयस ! ओके । हो, मॅनेजमेंटचाच आशीर्वाद आहे हेही ऐकिवात आहे माझ्या ! हा एक महत्त्वाचा विचार आहेच ! बरोबर आहे तुझं ! तत्त्व कसलं आलंय -- आपण पहिला आपला विचार करायचा ! स्वतःचा ! ॲग्रीड ! नाही, धरून नको चालू लगेच -- बरं, चालेल, उद्या भेटू आपण -- नाही, इतकं काही नाही -- हो रेस्टच घेतो -- हो, माझा तो एक प्रॉब्लेम आहेच लक्षात !-- अच्छा ! गुड नाईट ! ( फोन ठेवतो. क्षणभर उभा राहतो. मग --) उद्याचा एक दिवस तरी मी दांडीच मारणार आहे. पुढचं पुढं पाहू. दुसरे कोण काय करतायत हेही पाह्यला हवं. मी असं कुठल्या ग्रुपबरोबर नसल्यामुळं तर मला हे जास्त अवघड जात नसेल ? सध्याच्या युनियनचे पुढारी म्हणतात, तुमचा काही प्रश्न नाही, तुम्ही यांच्या भूलथापांना, धमक्यांना बळी पडणार नाही याची आम्हाला खात्री आहे. पण आपल्या दुसऱ्या सभासदांकडेही लक्ष ठेवा. आणि हा म्हणतोय, तुला धरून चालतो ! उद्या गेलो नाही तर घरी येणार ते ! दोघंही एका वेळी नाही आले म्हणजे बरं ! आईचं काय म्हणणं, नीलकंठा, वर्षातून एकदा देवीला जायला हवं, कुलदैवताला जायला हवं, एक तरी सत्यनारायण करायलाच हवा आणि रोजची देवपूजा घरात नीट व्हायला हवी -- कधीकधी तर दोन फुलंही नसतात घरात -- म्हणूनच असे सारखे निरनिराळे प्रश्न येत राहतात -- समाधान

लाभत नाही -- दुर्दैव इतकंच की माणसाचं विचारस्वातंत्र्य ही काय भयानक चीज आहे ते तिला माहीत नाही -- म्हणजे अर्थात् तिचं सुदैवच ते !...( काही क्षणांनी ...) कधीकधी शंका येते की, च्यायला मीच तर विकृत नाही ? ( हसतो. मोठ्यांदा हसत -- ) क्वाईट पॉसिबल, क्वाईट पॉसिबल ! ( अचानक हसू थांबवून --) हे सगळं च्यायला दुसरंच काहीतरी चाललेलं असतं ! खरं तर सतार शिकायचं ठरवलं होतं ! क्लासही नव्हता का लावला ? जातही होतो की काही दिवस ! उपटले एकजण, म्हणाले, कायरविशंकर होणाराय काय ? नामोहरमच करायचं ! हं, तुम्ही परीक्षा द्या, एखादा साईड बिझिनेस काढा--ते ठीक आहे. पण सतार ! नो ! रविशंकर आहेत ! तुम्ही कशाला वेळ वाया घालवताय ! माझा क्षण न् क्षण तिच्यायला असा गिळंकृत झालेला आहे. सामाजिक बांधिलकी म्हणजे समाजाची आपल्यावर असलेली बांधिलकी ! म्हणजे आपण कसं जगायचं ते समाजानं ठरवणं ! क्रूरपणा आहे सगळा ! क्रौर्य लागणारच हो याला ! समाजाची धारणाच शक्य नाही त्याशिवाय ! या क्रौर्याची जोपासना म्हणजेच सामाजिक बांधिलकी ! आणि ही तर सगळ्यांच्यावर असते ! आता त्यातले कुठले कुठले भाग महत्त्वाचे मानायचे हे प्रत्येकाचं वेगवेगळं डोकं चालू असतं ! म्हणूनच तर सगळी माणसं वेगवेगळी वाटतात साली ! आणि या सगळ्या वेगवेगळ्या माणसांना ' सामान्य माणूस ' अशी पदवी देऊन भडवे उदो उदो करतात त्यांचा ! सामान्य म्हणजे सर्वांमध्ये कॉमन असं पाहिजे -- कुठं काय असतं असं ? खरंच एकतरी माणूस सामान्य -- सगळ्यांमध्ये असलेला असा -- होऊ शकेल ? सगळ्या असामान्य माणसांना सामान्य म्हणणं ही या हिंसक सामाजिक बांधिलकीचीच एक भोंदूगिरी आहे ! भल्याभल्यांच्या हे टाळक्यात शिरत नाही ! -- असं मला वाटतंय म्हणजे मीच विकृत असेन नाहीतर ! मला एकट्याला अशी शंका कशी काय येते? नाही तर सालं हे येत असेल डोक्यात अनेकांच्या -- पण सामाजिक बांधिलकीमुळं बोलत नसतील ! विकृत लोकांची एक संघटना उभारल्याशिवाय काही खरं नाही ! निर्भयपणा येणार कसा त्याशिवाय ! पॉवर असल्याशिवाय विकृतीला कोण महत्त्व देणाराय ! म्हणजे हेच धंदे करावे लागणार ! विचारस्वातंत्र्याचे --! त्यापेक्षा आहे ती बांधिलकी परवडली ! निदान आपण नॉर्मल आहोत असं तरी दाखवत राहता येतं ! ( बसतो. क्षणभर. पुन्हा उभा राहतो.) आपल्या आजूबाजूच्या लोकांची मनं मोडल्याशिवाय, धोके पत्करल्याशिवाय जगायचं म्हटलं तर मेलाच तो माणूस ! नाहीतर मग खरोखर, मनापासून तो या विचारस्वातंत्र्याचा भोक्ता पाहिजे. भाकरी की विचारस्वातंत्र्य -- असले प्रश्न त्याला भावले पाहिजेत. हुकूमशाही वाईट किंवा एकवेळ हुकूमशाही परवडली -- असं काहीतरी त्याला वाटलं पाहिजे -- नाहीतर किमान हेमगिरी महाराज की जय !--एवढं तरी म्हणता आलं पाहिजे. संघटनांचं महत्त्व वाढलं की माणूस मेला ! त्याची संस्कृती मेली ! त्याची कला मेली ! प्रेतात जी एक विघटनाची शक्ती चालू असते तेच असल्या संघटनावाल्या समाजाचं जगणं ! माणूस हा कोंडाळ्यातच जगतो हे मरण पावलेल्या समाजाचं तत्त्वज्ञान असतंय ! तत्त्वज्ञानातून, धर्मातून, कलेतून, राजकारणातून, जाहिरातीतून-- सगळीकडून बांधत राहतात साले ! एक क्षण साधा, मोकळा राहू देत नाहीत ! -- मलासुध्दा हे सगळं रागावल्यामुळं, निराशेमुळं सुचत असेल बहुतेक ! विचाराला काहीतरी कारण असणारच -- म्हणूनच विचारावर औषधोपचार होऊ शकतो !आता हे माझ्यावर औषधोपचार करायची गरज मला पटवून देतील ! तेवढं पटलं तरी मग पुढं औषधोपचाराची गरज राहणार नाही ! कारण सध्या जे वाटतंय तेच बरोबर आहे असं वाटतंय -- म्हणून तर सुधारायची आवश्यकता आहे ! -- ( काही क्षणांनी --) शब्दांची गर्दी होणं, गोंधळून जाणं, वेडं होणं, आपल्याला जे कळतंय तेच अंतिम सत्य आहे आणि तेच बहुजनहिताचं आहे असं वाटणं -- हेच जिवंतपणाचं लक्षण आहे. संघटनात्मक अशा विघटनशील समाजाचा मृत्यू पावलेला जिवंत माणूस ! सत्याचं फार बिनचूक वर्णन लक्षात यायला लागणं म्हणजेच वेडेपणा ! कुणाला वेळ आहे ! अती झाल्यावर, फार ताणल्यामुळं, ब्रेक तुटलेला असला की गाडी अशी उधळत जाते -- वेळ असो, नसो ! याचा एक फायदा होईल. सगळ्या बाजूंचे लोक माझ्याबद्दल सहानुभूती बाळगतील आणि मी बरा होण्याची काळजी वाहतील. एखादा कणसुध्दा असा साशंक होणं हे समाजाला अत्यंत धोक्याचं आहे. मानवी हक्क म्हणजे सगळ्यांनी एकत्र मरण्याचा हक्क ! हा एकटाच कुठं चालला मरायला ! बिचारा ! ( काही क्षणांनी ) नुसतं नोकरी सोडली तरी हजारो प्रश्न बंद होतील !( काही क्षणांनी ) माणसांचे संपर्क कमीत कमी ठेवता आले पाहिजेत...( काही क्षण...) च्यायला, खरंच ताप येतोय की काय मला...( नुसता उभा राहतो. गळ्याला, कपाळाला हात लावून पाहतो...) स्थळ दिवाणखाना असलं म्हणजे ताप नाही...सगळं काही सोयीस्कर,पटणारं आणि

धोके टाळणारं घडत राहतं ...मी कोण आहे, कुठं आहे, काय करतोय, कशासाठी करतोय -- सगळं कळत राहतं ...सगळं कळायला पाहिजे...एखादा क्षण कळू शकणार नाही अशी नुसती कल्पनासुध्दा भयंकर भयानक वाटते... सगळं कळायला पाहिजे हा अट्टाहास असला की संघटनाकौशल्य आणि बेरजेचं राजकारण आलंच ! श्रध्देचं महत्त्व आलंच ! आपले सभासद वाढवणं आलंच ! म्हणजे माझ्यात विचारांचं मिक्स्चर असावं बहुतेक !-- एकमेकांच्या पूर्ण विरोधी विचार ! एकाच माणसात ! आहेत ! असू शकतात ! असतातच ! सुसंघटित, जिवंत समाजात तरी हेच असणार ! प्रत्येक माणसात ! याच शक्तीवर तर तो समाज पुढे जात असतो आणि बोंबलत असतो ! म्हणजे या ना त्या प्रकारे मीही एक बोंबलत पुढे जाणारा माणूस आहे !कष्ट कितीही चालतील पण ताप नको !हेच बरं ! सगळ्यांच्याबरोबर बोंबलत जाणं ! यश किती, अपयश किती, कितीजणांना तुम्ही तुमच्यावर अवलंबून ठेवू शकलात, कितीजणांना तुम्ही त्यांच्यावर उपकार केले असं वाटलं, कुठली सुखं उपभोगलीत, पुढच्या पिढ्यांची कितपत सोय केलीत -- हेच शेवटी महत्त्वाचं आहे. हाच शेवटी सारांश निघणार आहे. यासाठी क्रौर्य लागणारच ! क्रौर्याची जोपासना केल्याशिवाय सामाजिक बांधिलकी असूच शकत नाही ! ( काही क्षणांनी ...) माझ्या ब्रेकला काय झालंय ! फार वेळ असा तुटलेला ठेवणं धोक्याचं आहे ! कायमचा तुटला तर जगणं मुश्किल होईल...कुठंही जाऊन धडकेल सगळं...स्पीड...आणि वेळ नाही... मला मी आहे असा टिकायलाही हवा आहे आणि याव्यतिरिक्त काही शक्यता आहे का तेही कळायला हवं आहे. ( काही क्षण..) मी माझी स्वतःची सुखदुःखं आणि मानसिक गोंधळ तर बडबडत नाहीय ? आणि तसं असलं तरी ते का महत्त्वाचं नसावं ?अभिनय ही जर कला असेल आणि कला हे एक संस्कृतीचं अंग असेल तर कुठला अभिनय सुखदुःखाशिवाय असतो? एखाद्या व्यक्तीच्या सुखदुःखांना महत्त्व न देणारा अभिनय कसा असेल ? सुखदुःखांना महत्त्व न देणारं नाट्य असू शकेल ? याच्यातच तर करमणूक असते ! कधीकधी तर असा प्रश्न पडतो की एखादं गाणं म्हणताना विशिष्ट हालचाली करणारं शरीर बघितलं की मला मजा का वाटते ? एखादं दृश्य अत्यंत तीव्रपणे साकारणाऱ्या कलेची मला महती का वाटते ? सुखदुःखांची तीव्रता असलेलं नाट्य साकार केल्याशिवाय कुणी अभिनयसम्राट कसा बनेल ? असलं काहीतरी असल्याशिवाय तो कुणाची करमणूक तरी कशी करू शकेल ? आणि वेळ नाहीय कुणाला, चटकन करमणूकच हवीय. फास्ट. तेवढ्या वेळेपुरतं धरणारं असलं की बास ! नो टाईम ! जे करमणुकीचं तेच रोजच्या जगण्याचं हो ! फास्ट ! वेगळं काय असणार आहे ! अशा फटाफट प्रतिक्रिया देण्याच्या वेगात एखादवेळी माझ्या हातून कुणी मारलाही जाईल किंवा मी कुणाकडून मारला जाईन . पण काय फरक पडतो ? धिस इज लाईफ ! सामाजिक बांधिलकीच्या, पुढे जाणाऱ्या समाजाला आता माझं आयुष्य असं हवंय ! त्याशिवाय प्रगती होणार नाही. कशी होणार ? प्रगतीसाठी थोडंसं असंबध्द बडबडलं तरी काय हरकत आहे ? फक्त ते फास्ट पाहिजे. मरगळ नकोय. फास्ट नसणं म्हणजे मरगळ ! जे आपोआप ठरत जातंय त्याच्याबद्दल शंका घेणं हेच मुळात समाजविरोधी कृत्य आहे ! मग नीतीमत्तेचं काय हो? ती तर इतकी फास्ट बदलत नाही ! काही हरकत नाही. त्या त्या वेळी ते ते तसं तसं बघायचं ! खलास ! काही खरं नाही ! सगळं सालं गुन्हेगारीनं भरलेलं आहे असं वाटतं-- पण गुन्हेगारी म्हणजे काय हेच नीट समजत नाही -- पण काहीही म्हटलं तरी सगळेच गुन्हेगारच ठरतील यात मात्र शंका नाही ! मीसुध्दा ! मी कोण लागून गेलोय ! कुठल्या बिंदूपासून गुन्हेगारीचा प्रांत सुरू होतो ते कळायला पाहिजे...खरं म्हणजे मी एक जबाबदार माणूस आहे, माझे कुटुंबीय तरी निदान माझ्यावर अवलंबून आहेत. म्हणजे असं वाटतं. म्हणून मी भित्राही आहे. अजून काय हवंय ? निरपराध, निरुपद्रवी आयुष्य जगायला ?..... मृण्मयी एकदा म्हणाली होती, पपा, तुम्ही जास्त विचार नका करू -- म्हणजे माझा प्रॉब्लेम बहुतेक तिच्या लक्षात आला होता ! की विचाराचा तथ्यहीनपणाच तिच्या लक्षात आला असेल ? -- विचारांचा तथ्यहीनपणा तिला माझ्याइतका कळला असणं शक्यच नाही -- तशी खूपच लहान आहे ती ! पण हे तरी कसं ? एका विचाराचा तथ्यहीनपणा कळला काय आणि दहा लाख विचारांचा तथ्यहीनपणा कळला काय--काय फरक असणार आहे ! शून्य ते शून्य ! ....मला तो काय म्हणत होता की, माझी जी एक कामात चूक झालेली आहे, ती फ्रॉड धरली जाऊ शकते -- आणि ही अफरातफर एकदा सिध्द झाली की हकालपट्टीच ! -- पण त्याचं म्हणणं, अजून ते काही काढलेलं नाही -- तू इकडं जॉईन हो -- ते मिटवूनच टाकू -- ते कधीच वर येणार नाही -- मॅनेजमेंटच्या आशीर्वादाची युनियन असल्यामुळं आपल्याच हातात असणार आहे हे ! .... पण मुळात मी अफरातफर केलेलीच नाही

-- चूक झाली असेल --पण...पण त्याचं म्हणणं, तसा अर्थ होऊ शकतो...मग नुसतं दाखवायला डिपार्टमेंटल चौकशी वगैरे होईल -- कायद्यानं मला संधी द्यावी लागते म्हणून ती दिली जाईल -- पण निकाल आधीच ठरलेला असेल --आरोप सिध्द झाला ! -- शिक्षा -- हकालपट्टी ! -- मग पाहिजे तर पुढं कोर्टाबिर्टात जाऊन दाद मागत बस ! -- अशा परिस्थितीतही कुटुंब सांभाळण्याचा प्रयत्न करत -- जमलं तर ! बरं, असं झाल्यावर दुसरी नोकरी मिळणंही अवघड होईल ! दुसरं काय साधन आहे ? पैसे तरी आहेत थोडाफार काळ धकवता येईल इतके ? आपलं बघायचं भैया, जगाचा विचार सोड ! कसली आलीयत तत्त्वं ! सर सलामत तो तत्त्वं पचास ! -- हेही पटतंय सालं एका दृष्टीनं ! त्यातही एक कायम वाहणाऱ्या प्रवाहासारखा एक सततचा प्रॉब्लेम आहेच ! स्वातीचा मॅडनेस ! मला तर वाटतं जवळ जवळ लग्न झाल्यापासून हे आहेच -- मृण्मयीच्या जन्मानंतर वाढतच गेलेलं ! क्वचित कधी दोघीही अशा कुठं गेलेल्या असल्या की शांततासुध्दा खायला येते ! आणि उलटा प्रकार असा की उलट तीच मला मॅड धरून चालते ! एकदा तर या दुःखानं ती रडत होती हेही माझ्या लक्षात आलं होतं. त्या वेळी विशेष म्हणजे मृण्मयी तिला समजावत होती की मम्मी, तुला वाटतो इतका काही पपांचा प्रॉब्लेम नाहीय म्हणून ! लहान असून !...मी म्हणेल त्याला स्वाती हो म्हणते, मी म्हणेन ते बरोबर आहे म्हणते, सारखी मी डिस्टर्ब होऊ नये याची काळजी घेत राहते -- अक्षरशः वेड लागायची पाळी येते -- बरं, या तिच्या वागण्यामुळं कधी ना कधी मला संतापायला होणारच ! की बसली समजायचं मग ही तासंतास रडत ! तिचं हे असलं अधू मन सतत सहन करावं लागतंय तिच्या मारी ! पण करणार काय ! फक्त आपण आपले विचार जास्त काही सांगायचे नाहीत म्हणजे झालं ! हे अफरातफरीचं, युनियनचं काही बोलायचंच नाही म्हणजे झालं ! यात मला मात्र कुठलाच आधार राहात नाही -- असं होतंय !...फक्त जग कसं आहे ते थोडंफार मृण्मयीला माहीत असावं म्हणून तिला तेवढं थोडंफार सांगायचं, बास !-- नाहीतर सालं काही माहीतच नसलं तर पुढं फारच धक्का बसू शकेल -- तेवढी काळजी घ्यायची -- ती घेते म्हणा ऐकून -- आश्चर्य म्हणजे उपायही सुचवते मध्येच एखादा -- एकदा नाही का, ती म्हणाली होती, पपा, तुम्ही चव्हाणशी थोडी दोस्ती वाढवत न्या -- तर सालं खरंच, चमत्कार झाल्यासारखं निवळलं होतं सगळं ! -- पण या युनियनच्या वगैरे लफड्यांचा तिला ताण देण्यात काही अर्थ नाही --ती तरी धड राहिली पाहिजे -- आपल्यामुळं तिला धोका नको -- आपण काय -- काहीही केलं, कुठंही गेलो तरी स्थळ दिवाणखाना हेच चालू असतं. त्याच बिंदूवर सगळं घडत राहतं -- तोच बिंदू कमी जास्त तीव्र होत राहतो -- हा अनुभव तर नेहमीचाच आहे. पण साला हा बिंदू कधीही थांबत नाही -- नाहीसा होत नाही -- स्पीड आणि प्रेशर ! -- काय च्यायला यड्यासारखं तयार केलंय सगळं ! किंवा मलाच कळत नसेल -- किंवा मलाच असं वाटत असेल -- मी च्यायला एखादा मिसफिट तर नाही ? असणारच. कारण दुसरे लोक इतके हालअपेष्टा भोगणारे दिसत नाहीत. त्यांना वेळच नसतो. एक झालं की दुसरं अशी त्यांची पुढंपुढं प्रगती चालू असते. त्यांनाही जगण्याच्या हालअपेष्टा असणारच -- तशा हालअपेष्टांबद्दल प्रश्न विचारण्याच्या जास्तीच्या हालअपेष्टा माझ्या जगण्यात आहेत -- माझं असं का होत असेल ? उपयोग काय याचा ? ( दारावरची बेल वाजते --) तेच असणार ! पाचच मिनिटं, तुझी तब्बेत बघून जावी आणि भेटून जावं म्हणून आलो म्हणणार -- आणि पुन्हा तोच विषय येणार -- ते असं त्यांच्या म्हणण्याप्रमाणे होईपर्यंत माझ्या विचारस्वातंत्र्याला आवाहन करतच राहणार -- मला तर निर्णय कशावर आधारित घ्यायचा हेच कळत नाही-- दुसरे लोक तरी कशावर आधारित घेत असतील निर्णय ? त्यांना कसं काय जमतं सगळं ? आणि नाहीतरी मीसुध्दा एका युनियनचा सभासद आहेच नं ? त्याऐवजी दुसऱ्या युनियनचा झालो तर काय बिघडतंय ? ( दारावर हाताच्या थापा चालू होतात...) सध्याच्या युनियननं रागावून मला गाळात घालायचं ठरवलं म्हणजे ? ... दारावर बेल असूनही या अशा थापा पडतायत ... एखादवेळेस ते नसतीलसुध्दा....दुसरंच कुणीतरी ...( जोरात थापा...) म्हणजे अधीरपणा वाढत चाललाय ...( दाराजवळ जाऊन उभा राहतो...दारावर थापा पडतच राहतात...जोरजोरात...) ...पडदा पडत जातो....



पत्ता -चं.प्र.देशपांडे, ३, स्नेहदीप अपा. चिंतामणीनगर, सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९. **( दूरध्वनी - ४२२ ७८४७. )**